भाषा संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती-
डॉ.मंजुषा कुलकर्णी, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद.

**महाराष्ट्र शासन**
मराठी भाषा विभाग ,
शासन निर्णय क्र.भासंब-२०१५/प्र.क्र.१८/२०१५/भाषा-१
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ मे,२०१५

**प्रस्तावना:-**

भाषा संचालनालयातील भाषा संचालक (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ७६००) हे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाने भरण्याबाबत आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्यात आले होते. तथापि योग्य उमेदवार उपलब्ध न झाल्याने तसेच पदोन्नतीने देखील निम्न संवर्गात पात्र उमेदवार उपलब्ध नसल्याने सदर पद सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत सर्व मंत्रालयीन विभाग व क्षेत्रीय कार्यलयांकडून इच्छूकता मागविण्यात आली होती त्याअनुषंगाने सदर पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

भाषा संचालक पदाच्या दि.२६.९.२०१३ रोजी अधिसूचित झालेल्या सेवा प्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार डॉ.मंजुषा कुलकर्णी, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद यांची प्रशासकीय कारणास्तव भाषा सचांलक, भाषा संचालनालय या पदावर तीन वर्षांसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्ती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा बदलीने नियमितरित्या, महाराष्ट्र शिक्षण सेवेमधील वा सामान्य राज्य सेवेमधील विहित नियमित सेवा झालेल्या व समकक्ष पद धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची नेमणूक होईपर्यंत किंवा ३ वर्षापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तो पर्यंत करण्यात येत आहे.

सदर नियुक्ती ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी) नियम १९८१ मधील नियम ४० संबंधी परिशिष्ट-२ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

भाषा संचालक (गट-अ), (वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड पे ७६००) हे पद तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी अवनत करुन सदर पदावर डॉ.मंजुषा कुलकर्णी, सहायक प्राध्यापक यांची त्यांच्या विद्यमान वेतनश्रेणीत (रु.१५६००-३९१०० ग्रेड पे-६०००) प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास या आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. श्रेणी अवनत केलेले 'भाषा संचालक' हे पद डॉ.मंजुषा कुलकर्णी, सहाय्यक

प्राध्यापक या त्या पदावर असेपर्यंतच अस्तित्वात राहील. त्यांनंतर हे पद आपोआप मूळ संवर्गात श्रेणी उन्नत होईल.

डॉ.मंजुषा कुलकर्णी यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी संबंधितांना निदेश द्यावेत.

डॉ.कुलकर्णी यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु होऊन तसा अनुपालन अहवाल सादर करावा. डॉ.कुलकर्णी या ज्या दिनांकाला रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक सं.क्र. २२३/२०१५/सेवा-९ दि.२०.५.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५२८१६२५२०९५३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhaku Raghunath Chindarkar

Digitally signed by Dhaku Raghunath Chindarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e3616834867d2d04065211a95f36cef4d8ad17e2fb18bc0ad65e7677dbe52edc, cn=Dhaku Raghunath Chindarkar
Date: 2015.05.29 14:51:58 +05'30'

**(धा.र.चिंदरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

डॉ.मंजुषा कुलकर्णी, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद.

प्रति,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
५. उप सचिव, वित्त विभाग(सेवा-९), मंत्रालय,मुंबई.
६. उपसचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग(माशि-१), मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
८. मा.मंत्री(मराठी भाषा विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१०.भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११.प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई

१२.सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,मुंबई

१३.सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ,मुंबई.

१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१५.प्र.प्राचार्य,शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद.

१६.विभागीय सहायक भाषा संचालक/सहायक भाषा संचालक, विभागीय कार्यालय, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नवी मुंबई(भाषा संचालनालयामार्फत)

१७.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. निवड नस्ती.